**दमणगंगा (एकदरे) गोदावरी उपसा नदीजोड योजनेचे सर्वेक्षण व अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१८/६६/२०१८/जसंअ**
नविन प्रशासकीय इमारत, ६ वा मजला,
मंत्रालय, मुंबई-४०००३२
दिनांक:- ४ जुन, २०१८

**संदर्भ :**

१. कार्यकारी संचालक, गोदावरी पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद यांचे पत्र क्रमांक गोमपाविम/तां-५/७०८८, दिनांक ७.९.२०१७

**प्रस्तावना:-**

दमणगंगा नदी खोऱ्यातील पश्चिम वाहिनी नदयांचे अतिरिक्त पाणी पूर्वेकडे गोदावरी खोऱ्यात वळविण्यासाठी तयार करण्यात आलेली दमणगंगा (एकदरे) गोदावरी उपसा जोड योजना पूर्व व्यवहार्यता अहवालानुसार सफल ठरत असल्याचा निष्कर्ष मुख्य अभियंता (दक्षिण), राष्ट्रीय जलविकास अभिकरण, हैद्राबाद यांनी पूर्व व्यवहार्यता अहवालात नमूद केला आहे.

राष्ट्रीय जलविकास अभिकरणाने तयार केलेल्या पूर्व व्यवहार्यता अहवालानुसार या योजनेचे लाभव्यय गुणोत्तर १.४४ इतके येते. सदर योजनेतून १०० दलघमी पाणी सिंचनासाठी व ४३ दलघमी पाणी बिगर सिंचन प्रयोजनार्थ उपलब्ध होऊ शकते. या योजनेअंतर्गत १ धरणे बांधण्याचे प्रस्तावित असून अस्तित्वात असलेल्या गंगापूर धरणाशी बोगदयाव्दारे /पाईपलाईनव्दारे जोडण्याचे नियोजन असून १४३ दलघमी पाणी उपसा पध्दतीने गोदावरी खोऱ्यात वळविण्याचे प्रस्तावित आहे.

सदर योजनेचे सविस्तर सर्वेक्षण व अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठीचे अंदाजपत्रक राष्ट्रीय जलविकास प्राधिकरणाने (National Water Development Agency) विचारार्थ पाठविले होते व सदर प्रस्ताव गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद, यांनी अभिप्रायासह संदर्भ क्र. १ च्या पत्रान्वये शासनास प्रशासकीय मान्यतेकरिता सादर केला होता. त्याअनुषंगाने सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी लागणाऱ्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

दमणगंगा (एकदरे) गोदावरी उपसा नदीजोड योजनेचे सखोल सर्वेक्षण व अन्वेषण करून सविस्तर प्रकल्प अहवाल तयार करण्यासाठी रू. १७,७४,१८,०००/- (रूपये सतरा कोटी चौऱ्याहत्तर लाख अठरा हजार फक्त ) किंमतीच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या प्रकल्पावर होणारा खर्च " मुख्य लेखा शिर्ष ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च, ८० सर्व साधारण, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणूक, (०२) योजनांतर्गत, (०२)(०५) उर्वरित महाराष्ट्र प्रदेशाकरिता गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भागभांडवली अंशदान (४७०१ एच ८९९) या मंजूर असलेल्या अनुदानातून करण्यात यावा".

हा शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या अनुक्रमे अनौपचारीक संदर्भ क्र.६०/२०१८ व ९६/२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०६०४१२०३२५९३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajnish Ramkishor Shukla

Digitally signed by Rajnish Ramkishor Shukla
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d37cbfb080a0bc996a710b3c0aeea737985dac09cb66bbff878f42ad4e77a606, cn=Rajnish Ramkishor Shukla
Date: 2018.06.04 12:04:11 +05'30'

( र.रा.शुक्ला )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री, (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव
३. प्रधान सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
५. सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. सचिव, महाराष्ट्र जलसंपत्ती नियमन प्राधिकरण, मुंबई
७. कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद
८. मुख्य अभियंता, जलविज्ञान प्रकल्प, नाशिक
९. आंतरवित्तीय सल्लागार व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०.वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११.नियोजन विभाग, मंत्रालय,मुंबई-३२
१२.विभागीय आयुक्त (अनुदेयता), महाराष्ट्र राज्य मुंबई/नागपूर
१३.जसंअ कार्यासन संग्रहार्थ